नीला सत्यनारायण
प्रधान सचिव (अ.व सु.)

अ.शा.प.क्रमांक:-आरईएच ०१/२००१/५७/विशा-५,
गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ जानेवारी, २००४

विषय:-हॉटेलबाबतची नियमावली
हॉटेल परवाना फी वाढीबाबत.
पुलपार्लर,बिलीयर्ड गेम व इतर
खेळ याबाबत.

प्रिय श्री/श्रीमती

आपल्याकडील सार्वजनिक जागेत करमणूक करण्याबाबतचे नियम व सिनेमाव्यतिरिक्त सार्वजनिक मनोरंजनाच्या जागांसाठी सार्वजनिक मनोरंजनाच्या कार्यक्रमासाठी परवानगी देणे व नियंत्रण ठेवणे याबाबतचा नियम,१९६० (नियमाचे नांव संक्षिप्त) या नियमान्वये हॉटेल परवाना फी मध्ये वाढ करणे, संबधित नियमांत सुधारणा करणे, पुल पार्लर व बिलीयर्ड गेम व इतर खेळ या नविन खेळांचा नियमात समावेश करणे त्याकरिता संबधित नियमात सुधारणा करणे, परवाना फी निश्चित करणे, परवाना फी मध्ये वाढ करणे याबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबत समक्रमांकाचे दि.२७.३.२००३,५.६.२००३, १४.०७.२००३,०३.१२.२००३ चे पत्रान्वये सर्व जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त यांना सविस्तर सुचना देण्यात आल्या होत्या. परंतु तरीही बहुतांश जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त यांनी आपल्याकडील हॉटेल परवाना संबधित नियमात अद्याप सुधारणा केलेली नाही. परवाना फी मध्ये वाढ केलेली नाही अथवा सुधारीत परवाना फी प्रमाणे वसुली सुरु केलेली नाही. त्याचप्रमाणे पुल पार्लर व बिलीयर्ड गेम व इतर खेळ या खेळांच्या संबंधित नियमात समावेश केलेला नाही. त्याअनुषंगाने संबंधित नियमात सुधारणा केलेली नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. विविध परवान्याद्वारे परवाना फी मधुन शासनास महसूल प्राप्त होत असल्याने पर्यायाने जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त परिक्षेत्रांनाही महसूल प्राप्त होत असल्याने या विषयाचे गांभीर्य लक्षात घेऊन तातडीने कार्यवाही करणे व त्याप्रमाणे केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करणे आवश्यक आहे. परंतु बहुतांश जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त यांनी अद्यापपर्यंत संदर्भाधिन पत्रान्वये कळविल्याप्रमाणे काहीही कार्यवाही केलेली नसल्याचे अथवा संदर्भाधिन पत्रान्वये कळविल्याप्रमाणे कार्यवाही केली असल्यास त्याप्रमाणे अंमलबजावणी अद्याप सुरु केली नसल्याचे व काही जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त यांनी अंमलबजावणी केली परंतु फी वाढ केल्याने किती जादा महसूल प्राप्त झाला आहे याबाबत अद्याप शासनास माहिती सादर केली नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

३. शासनाने वेळोवेळी सविस्तरपणे सुचना देऊनही शासनाच्या सुचनांची अंमलबजावणी केली जात नाही असे याद्वारे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सदर विषय शासनाच्या महसूलाशी निगडीत आहे. त्यामुळे परवाना प्राधिकारी जिल्हादंडाधिारी व पोलीस आयुक्त यांनी स्वत: याबाबत जातीने लक्ष घालून शासनाने दिलेल्या सुचनांची अंमलबजावणी होईल याबाबत खबरदारी घ्यावी. तसेच त्याअनुषंगाने आपल्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचा-यांना मार्गदर्शन करावे/सुचना दयाव्यात व कोणत्याही परिस्थितीत या संदर्भातील सर्व कार्यवाही जानेवारी, २००३ अखेरपर्यंत पूर्ण करावी.

तसेच सध्या आपल्या स्तरावर या संदर्भात कार्यवाही कोणत्या स्तरावर आहे याबाबत सर्व जिल्हादंडाधिकारी व पोलीस आयुक्त यांनी शासनास कोणत्याही परिस्थितीत आठ दिवसांत अवगत करावे.

आपली,

(नीला सत्यनारायण)

प्रति,

सर्व जिल्हादंडाधिकारी,
सर्व पोलीस आयुक्त.

प्रत माहिती व कार्यवाहीकरीता.

पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,

यांना कळविण्यात येते की उक्त विषयाच्या अनुषंगाने आपल्या स्तरावरुनही आपल्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचारी यांना सुचना द्याव्यात ही विनंती.